राज्य शासनाच्या विभागांच्या जिल्हाधिकारी यांच्यासमवेत आयोजित बैठकांच्या अनुषंगाने सुचना

## महाराष्ट्र शासन

### महसूल व वन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक:-संकीर्ण-२०२५/प्र.क्र.११/म-८**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:-२०.०२.२०२५

---

## परिपत्रक

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक १९.०३.२०१६ अन्वये जिल्हाधिकारी यांना विभागप्रमुख म्हणून घोषित केलेले आहे. जिल्हाधिकारी हे महसूल विभागाच्या आकृतीबंधातील पद आहे. महसूल विभागाच्या कामकाजासोबतच इतर विभागांशी समन्वय व संनियंत्रणाची जबाबदारी पार पाडण्याची भूमिका जिल्हाधिका-यांना पार पाडावी लागते. गाव, तालुका , उपविभाग व जिल्हास्तरावरील महसूल व इतर विभागांच्या विविध योजनांची अंमलबजावणी, समन्वय व संनियंत्रणाची जबाबदारी जिल्हाधिका-यांवर असते. त्यामुळे ओघानेच जिल्हाधिकारी यांना राज्य शासनाच्या विविध विभागांच्या बैठकांसाठीही व्यक्तीश: किंवा व्हीसीद्वारे उपस्थित राहावे लागते. आठवड्यातील बहुतांश दिवसांसाठी वेगवेगळ्या विभागांकडून बैठकांसाठी जिल्हाधिकारी यांना निमंत्रित केले जाते. बैठकांतील व्यस्ततेमुळे त्यांच्यावरील कामाचा ताण दिवसेंदिवस वाढत आहे. त्यामुळे महसूल विभागाच्या कामांना तसेच, मा. मुख्यमंत्री महोदयांच्या १०० दिवसांच्या कार्यक्रम अंमलबजावणीस विलंब होत असल्याचे निदर्शनास येत आहे. त्यामुळे जिल्हाधिकारी यांच्या कामात सुसुत्रता / नियोजनबध्दता आणण्यासाठी व त्यांच्यावर असलेल्या जबाबदारीला यथोचित न्याय देणे शक्य व्हावे यासाठी खालील सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१) मा. मुख्यमंत्री, मा. उपमुख्यमंत्री व मा. मुख्य सचिव वगळता राज्य शासनाच्या अन्य विभागांना जिल्हाधिकारी यांच्यासमवेत बैठक आयोजित करावयाची असल्यास फक्त बुधवार व गुरुवार या दोन दिवशी तसेच शक्यतो व्हीसीद्वारेच आयोजित करण्यात यावी. तसेच, महसूलेतर अत्यावश्यक विषयासंदर्भात बैठक आयोजित करण्यापूर्वी संबंधित विभागाने त्यासाठी महसूल विभागाची लेखी पूर्वपरवानगी घ्यावी.

२) तसेच अन्य विभागांनी बैठकीसाठी जिल्हाधिकारी यांना जिल्हा मुख्यालय सोडून अन्य ठिकाणी उदा. मंत्रालय, विभागीय आयुक्त कार्यालये येथे बैठकीसाठी महसूल विभागाच्या परवानगीशिवाय व्यक्तीश: बोलावणे टाळावे.

सदर परिपत्रक हे मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संकेतांक २०२५०२२०१५२७०८८२१९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAJESH KUMAR
Date: 2025.02.20 15:27:56 +05'30'

**( राजेश कुमार )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा.राज्यपाल , महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे प्रधान सचिव , मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री ( नगरविकास ) यांचे प्रधान सचिव , मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई.
६) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व विभागीय आयुक्त (महसूल )
८) सर्व जिल्हाधिकारी